**श्रीमती केतकी अविनाश देठे, उपअभियंता (विदयुत) यांची सहायक महाव्यवस्थापक (विदयुत) ,मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. येथे प्रतिनियुक्तीने नियुक्ती.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २०१७/ प्र.क्र. १७३ /सेवा-२**
सार्वजनिक बांधकाम विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ७ सप्टेंबर, २०१७

## शासन आदेश

शासन आदेश क्रमांक : एलटीएस २०१७/प्र.क्र. ९९/सेवा-२, दिनांक ३१.०५.२०१७ अन्वये श्रीमती केतकी अविनाश देठे, यांची कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विदयुत विभाग, अंतर्गत उप अभियंता (विदयुत), दादर विदयुत उप विभाग या पदावर पदस्थापना करण्यात आली आहे.

२. कुलाबा-बांद्रा-अंधेरी (सीप्झ) मेट्रो लाईन-३ उभारण्यासाठी केंद्र शासन आणि महाराष्ट्र शासनाच्या संयुक्त उपक्रमातून मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. ही कंपनी स्थापन करण्यात आली असून सदर प्रकल्पासठी सहायक महाव्यवस्थापक (विदयुत) हे पद प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांनी घेतलेल्या मुलाखतीद्वारे श्रीमती केतकी अविनाश देठे, यांची सदर पदासाठी निवड करण्यात आलेली आहे.

३. श्रीमती केतकी अविनाश देठे, उपअभियंता (विदयुत) यांची सहायक महाव्यवस्थापक (विदयुत) ,मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यास सक्षम प्राधिकारी यांनी मंजूरी दिलेली आहे. त्यामुळे श्रीमती केतकी अ. देठे, उप अभियंता (विदयुत) यांची या आदेशान्वये सहायक महाव्यवस्थापक (विदयुत), मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

४. प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वयेतर सेवा इत्यादी) नियम १९८१ मधील परिशिष्टि दोन मधील नमूद शासकीय कर्मचा-यांची स्वीयेतर सेवेत बदली करण्यासंदर्भातील प्रमाण अटी व शर्ती मधील तरतूदीनुसार व या संदर्भातील वित्त विभागाच्या दिनांक ०९.०५.२०१३ मधील सुधारित अधिसूचनेतील तरतूदीनुसार राहतील.

५. हे आदेश, शासन निर्णय, वित्त विभाग क्र स्वीएसे १०८७/८५३/सेवा-८, दिनांक १८.०७.१९८५ अन्वये मंत्रालयीन विभागाना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

६. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्रीमती केतकी अविनाश देठे, उप विभागीय अभियंता (विदयुत) यांना प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे. श्रीमती देठे यांनी त्यांच्या नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल, तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही, याची जाणीव त्यांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांना देण्यात आलेली पदस्थापना रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील याचीही त्यांनी नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०७१२५००३४३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2017.09.07 12:39:18 +05'30'

**(अ.ज. कांबळे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल, १ / २ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर.
२. मुख्य अभियंता (विदयुत), सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई
३. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. मुंबई.
४. अधिदान व लेखाधिकारी, बांद्रा, मुंबई.
५. श्रीमती केतकी अ. देठे, उप अभियंता (विदयुत), दादर विदयुत उप विभाग यांना मुख्य अभियंता (विदयुत), सार्वजनिक बांधकाम विभाग मुंबई यांच्या मार्फत.
६. खाजगी सचिव, मा. मंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम)/मा. राज्यमंत्री, सा.बां., (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (सा.बां.वि.)/सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
८. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.